कॅप्टिव्ह मार्केट योजना- सन २०२४-२५
करीता निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र:- संकीर्ण २०२४/प्र क्र.५२ (भाग-१)/टेक्स-२**
१६ वा मजला, नवीन प्रशासन भवन,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक -: २७ मार्च, २०२५

**वाचा :** १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.धोरण २०२३/प्र.क्र.८१/टेक्स-५, दि.०२.०६.२०२३

२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. धोरण २०२३/प्र.क्र. १०६/टेक्स-५ दि.०३ नोव्हेंबर, २०२३.

३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. सपववि-३७०१२/९८/२०२३-DESKTEX-२ दि.१० नोव्हेंबर, २०२३.

४) शासन पत्र क्र. सपववि-३७०१२/९८/२०२३-टेक्स-२ (६४९४८८), दि. ०९ सप्टेंबर, २०२४

५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र:- संकीर्ण २०२४/ प्र.क्र.५२/टेक्स-२ दिनांक ७ ऑक्टोबर, २०२४

६) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र:- संकीर्ण २०२४/ प्र.क्र.५२/टेक्स-२ दिनांक २२ जानेवारी, २०२५

७) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र:- संकीर्ण २०२४/ प्र.क्र.५२/टेक्स-२ दिनांक २१ मार्च, २०२५

८) शासन शुध्दीपत्रक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र:- संकीर्ण २०२४/ प्र.क्र.५२/टेक्स-२ दिनांक २२ जानेवारी, २०२५

**प्रस्तावना :-**

राज्याचे “एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८” संदर्भ क्र १ येथील शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आले आहे. सदर शासन निर्णयामधील परिच्छेद क्र.११(३) नुसार अंत्योदय शिधापत्रिका धारक कुटुंबाना वस्त्रोद्योग विभागामार्फत यंत्रमागावर विणलेली प्रति कुंटुंब प्रतिवर्षी एक साडी उपलब्ध करुन देण्याची कॅप्टिव्ह मार्केट योजना संदर्भ क्र. ३ नुसार राज्यात सुरु करण्यात आली आहे. सदर योजनेसाठी महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्या., नवी मुंबई यांना नोडल संस्था नेमण्यात आले आहे. महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाने यापूर्वी सन २०२३-२४ व सन २०२४-२५ करीता निश्चित केलेल्या पॅनल मधील संस्थांकडून शासनाने विहीत केलेल्या साड्यांच्या स्पेसिफिकेशन नुसार अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाकडे उपलब्ध असलेल्या अंत्योदय शिधापत्रिकाधारक कुटुंबांची संख्या तपासून तेवढ्या साड्यांचे उत्पादन करुन राज्याच्या सार्वजनिक वितरण व्यवस्थेकडील सर्व जिल्ह्यांतील गोदामापर्यंत पुरवठा करण्यास व महामंडळाच्या प्रस्तावानुसार रु. ९६.२० कोटी इतका निधी खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता संदर्भ क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये दिली आहे.

प्रस्तुत योजनेंतर्गत साड्यांचे वितरण राज्य शासनाच्या सार्वजनिक वितरण प्रणाली अंतर्गत करण्यात येणार असून लाभार्थ्यांना रास्त भाव दुकानांमधून साडी वितरीत करण्यात येणार आहे. सदर योजनेकरीता साड्यांचे उत्पादन, वाहतूक, जाहिरात, प्रसिध्दी, साठवणूक, हमाली यासाठी येणारा खर्च महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाला राज्य शासनाकडून देण्यात येणार आहे. तद्नंतर संबंधीतांना देयके अदा करण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाची असेल.

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात सदर योजनेकरीता रु.१००.०० कोटी इतका निधी मागणी क्र.व्ही-२, २८५१,ग्रामोद्योग व लघुद्योग,(००)११०,संमिश्र ग्रामोद्योग व लघुद्योग आणि सहकारी संस्था,(०३) एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८, (०३) (०१) एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ अंतर्गत कॅप्टिव्ह मार्केट योजना (कार्यक्रम),३३, अर्थसहाय्य (२८५१ ७४४५) अंतर्गत मंजूर करण्यात आलेला आहे. त्याअनुषंगाने सदर योजनेकरीता सन २०२४-२५ करिता रु. ९६.२० कोटी इतक्या रकमेचा निधी वितरणाचा प्रस्ताव वित्त विभागास सादर केला होता. त्यानुसार सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पीत रु. १००.०० कोटी तरतुदीपैकी रु. ७०.०० कोटी वितरीत करण्यास वित्त विभागाने यापूर्वी मान्यता दिलेली होती. त्यानुषंगाने, संदर्भ क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये रु. ६०.०० कोटी व संदर्भ क्र. ७ येथील शासन निर्णयान्वये रु. १०.०० कोटी, असे एकूण रु. ७०.०० कोटी महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाला वितरीत करण्यात आले आहेत.

वित्त विभागाने आता, १०० टक्केच्या मर्यादेत रु. २६.२० कोटी इतका निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. त्यास अनुसरुन सदर योजनेकरीता साड्यांचे उत्पादन, वाहतूक, जाहिरात, प्रसिध्दी, साठवणूक, हमाली व इतर खर्च यासाठी येणारा खर्च वितरीत करावयाचा असल्यामुळे महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळास रु. २६.२० कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

सन २०२४-२५ वर्षाकरिता कॅप्टीव्ह मार्केट योजनेअंतर्गत अंत्योदय शिधापत्रिका धारक कुटुंबाना वस्त्रोद्योग विभागामार्फत यंत्रमागावर विणलेली एक साडी प्रति कुटुंब प्रतिवर्षी भेट देण्याच्या अनुषंगाने साड्यांचे उत्पादन, वाहतूक, जाहिरात, प्रसिध्दी, साठवणूक, हमाली व इतर खर्च यासाठी येणारा खर्च संबंधीतांना वितरीत करण्यासाठी सदर योजनेची नोडल संस्था असलेल्या महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाला रु. २६.२० कोटी इतका निधी वितरीत करण्यास या आदेशान्वये शासन मान्यता देण्यात येत आहे. **सदर देयक हे बिनशर्त स्वरुपाचे आहे.**

२. सदर योजनेची अंमलबजावणी ही संदर्भ ३ मधील शासन निर्णयातील कार्यपद्धतीनुसार करावी.

३. शासनाने विहित केलेल्या निकषाप्रमाणे उत्पादन केलेल्या साड्या व्यवस्थितरित्या सार्वजनिक वितरण व्यवस्था (PDS) यंत्रणेच्या तालुका स्तरावरील गोदामापर्यंत पोच झाल्याची महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाने खात्री केल्यानंतरच संबंधीतांना देयके अदा करण्यात यावीत.

४. महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाने संबंधीतांची देयके अदा केल्यानंतर त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र देयकांच्या प्रतीसह शासनास सादर करावे. संबंधीतांची देयके अदा केल्यानंतर शिल्लक निधी महामंडळाने शासन खाती जमा करावा.

५. महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाने सर्व साड्यांचे वितरण झाल्यानंतर शासनास सविस्तर अहवाल सादर करावा.

६. वित्त विभाग शासन परिपत्रक अर्थस-२०२४/प्र.क्र. ८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४ मधील परिच्छेद ३ च्या अनुषंगाने महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाला सदर योजनेअंतर्गत वितरीत करावयाचा निधी हा परिशिष्ट क्र. ९ मधील “३३ अर्थसहाय” या बाबी करिता मंजूर करण्यात येत असून सदर परिशिष्टातील तपासणी सूचीनुसार लागू असणाऱ्या मुद्यांची पूर्तता करुन घेण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्या., मुंबई यांची राहील.

७. प्रस्तुत प्रयोजनांकरिता उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी हा सन २०२४-२५ वर्षाकरिता खालील लेखाशिर्षांतर्गत मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

मागणी क्र.व्ही-२,<br>
२८५१,ग्रामोद्योग व लघुद्योग,<br>
(००)११०,संमिश्र ग्रामोद्योग व लघुद्योग आणि सहकारी संस्था,<br>
(०३) एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८,<br>
(०३) (०१) एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ अंतर्गत कॅप्टिव्ह मार्केट योजना (कार्यक्रम),<br>
३३, अर्थसहाय्य (२८५१ ७४४५)

८. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या रक्कमेचे आहरण करून महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्या, मुंबई यांना वितरीत करण्याकरिता श्री. सु.पु.पांगारकर, कार्यासन अधिकारी (रोखशाखा) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व श्री. श्रीकृष्ण पवार, उप सचिव (वस्त्रोद्योग) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय मुंबई -३२ यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम अधिदान व लेखाधिकारी कार्यालय मुंबई, येथून आहरीत करून महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्यादित, मुंबई (MAHARASHTRA STATE POWERLOOMS CORPORATION LTD. MUMBAI) यांच्या CANARA BANK, Nerul West, Navi Mumbai - 400 706. A/c no- 50353050000033, IFSC Code- CNRB0015496, MICR CODE - 400015248 या बँक खात्यावर RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

९. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्रमांक क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/ अर्थ-३ दि. १७ मार्च, २०२५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकार अन्वये व वित्त विभाग अनौ.सं क्र. २२२८/२०२५/व्यय-२ दि.२५.०३.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०३२७११०७२३९१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA NAMDEV PATIL

Digitally signed by RAVINDRA NAMDEV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CO-OPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=6086895df04b938ea57e5ae6b34823daabcdbb05119b0cab8aa75feb5283c773, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C69BF686C6E48D54399329327C672B8AFEC5ACC7354D86E6BEAAEDBC31024E4E, cn=RAVINDRA NAMDEV PATIL
Date: 2025.03.27 11:08:33 +05'30'

**(रविंद्र ना. पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (नगरविकास, गृहनिर्माण, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम)) महाराष्ट्र राज्य याचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त) महाराष्ट्र राज्य याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मंत्री (वस्त्रोद्योग), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७) सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन ववस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सचिव (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग), मंत्रालय, मुंबई.
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
१०) महालेखापाल (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर.
११) महालेखापाल (वाणिज्यिक लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर.
१२) आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर.
१३) उपसचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन ववस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ, नवी मुंबई
१५) कक्ष अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) अवर सचिव (१७-स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) निवड नस्ती (टेक्स-२)